शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांना सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या लेखाशिर्षाखाली, (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत २ संस्थांना निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२१/प्र.क्र.१८३/प्रशा-२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
तारीख: ११ नोव्हेंबर, २०२१

**वाचा-**

१) **शासन पत्र क्रमांकः वैशिवि-२०२१/प्र.क्र.१८३/प्रशा-२, दिनांक १७.०८.२०२१**
२) **संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे पत्र क्रमांकः संवैशिवसं/(१०)कंसेवा/ अनिवित/आय-१/२०२१-२२/१३११५/२१, दिनांक २८.०९.२०२१**
३) **वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.**

**प्रस्तावना -**

वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभागाकरीता २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टातंर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरीता एकूण रु. १२४.३२ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता. तसेच त्यातील ३९ संस्थांना १००% अनुदान वितरित करण्यात आले असून ८ संस्थांना ७५% तर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नंदूरबार या २ संस्थांना ५०% निधी वितरित करण्यात आलेला आहे. तथापि, सदर संस्थांना या उद्दिष्टातंर्गत १००% निधी वितरित झालेला नसल्याने सदर संस्थाकरीता एकूण अर्थसंकल्पित निधीपैकी यापुर्वी वितरित करण्यात आलेला निधी वगळून उर्वरित निधी बीडीएस प्रणालीवर वितरित करण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली होती. त्याअनुषंगाने वित्त विभागाने त्या विभागाच्या दिनांक १४.१०.२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता अर्थसंकल्पित निधीच्या ७५% च्या प्रमाणात निधी वितरित/खर्च करण्यास मंजूरी प्रदान केली आहे. शासनाने ज्या ९ संस्थांसाठी निधीची मागणी वित्त विभागाकडून केली आहे त्या १० संस्थांपैकी ८ संस्थांना यापुर्वीच ७५% निधी वित्त विभागाच्या मान्यतेने वितरित केला आहे. यापुर्वी ज्या संस्थांना केवळ ५०% निधी वितरित झाला आहे, अशा २ संस्थांना त्यांचा उर्वरित २५% निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभागाकरीता २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टातंर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरीता एकूण रु. १२४.३२ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या दिनांक १४.१०.२०२१ रोजीच्या परिपत्रकानुसार वित्त विभागाने ७५% च्या प्रमाणात निधी वितरणास दिलेल्या मान्यतेच्या खालील २ संस्थांना यापुर्वी केवळ ५०% निधी वितरित करण्यात आला असल्याने उक्त संस्थांना उर्वरित २५% निधी खालील

तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे एकूण रु. २५३.३० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम लक्ष रुपयात)**

| **अ.क्र.** | **संस्थेचे नाव व लेखाशिर्ष क्रमांक** | **अर्थसंकल्पित निधी** | **यापुर्वी वितरित ५० टक्के तरतूद** | **सदर शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेली रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | शावैमवरु, बारामती (२२१० G ८७९) | १९३.३२ | ९६.६६ | ४८.३३ |
| २ | शावैमवरु, नंदुरबार (२२१० E ९४७) | ८१९.९० | ४०९.९५ | २०४.९७ |
| **एकूण** | | | | २५३.३० |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण रु. २५३.३० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला असून विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४७६/व्यय-१३, दिनांक १२.१०.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११११२५४०७१३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE9678639 7786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2021.11.11 18:03:18 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.

५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.

६. सर्व अधिष्ठाता, संबंधित शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये.

७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, नागपूर/मुंबई.

८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई

९. निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई.